**जिल्हा विकास आराखडा (District Strategic Plan) तयार करण्यासाठी विविध स्तरावर समित्यांचे गठन करणे तसेच मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. : डिएपी - १०२३/प्र.क्र.९८/का.१४८१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० एप्रिल, २०२३

**<u>प्रस्तावना</u>:-**

भारत सरकारकडून स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त भारताला सन २०४७ पर्यंत "विकसित भारत- भारत@२०४७ (India@२०४७)" करण्याचा संकल्प करण्यात आलेला आहे. यामध्ये सन २०२५-२६ पर्यंत भारताची अर्थव्यवस्था ५ ट्रिलियन डॉलरपर्यंत नेण्याचे उद्दिष्ट जाहीर केले आहे. तसेच, सन २०३० पर्यंत शाश्वत विकास उद्दिष्टे सुध्दा साध्य करण्याचा भारत सरकारचा मानस आहे. विकसित भारताची ही उद्दिष्टे साध्य करीत असताना भारतातील राज्यांना सुध्दा सन २०४७ पर्यंत संपूर्णपणे विकसित होणे गरजेचे आहे. याद्दष्टीने महाराष्ट्र राज्याची अर्थव्यवस्था सन २०२७ पर्यंत १ ट्रिलियन डॉलर, सन २०३७ पर्यंत २.५ ट्रिलियन डॉलर व सन २०४७ पर्यंत ३.५ ट्रिलियन डॉलर इतकी पोहोचविणे हे राज्याचे मुख्य ध्येय आहे. यासाठी विकासाचे केंद्र म्हणून जिल्ह्यावर लक्ष केंद्रित केल्याने आर्थिक विकासासाठी विचारपूर्वक आणि विशिष्ट द्दष्टीकोन विकसित करणे शक्य होईल व असा विकास सर्वसमावेशक असेल आणि शाश्वत विकास उद्दिष्टे साध्य करण्यात मदतही करेल. विविध जिल्ह्यातील सामाजिक-आर्थिक परिस्थिती आणि नैसर्गिक संसाधनांमधील असमानता आणि जलद शहरीकरणाच्या आव्हानांना सामोरे जाण्याची गरज या सर्व बाबी विचारात घेऊन प्रत्येक जिल्ह्यांसाठी "जिल्हा विकास आराखडा" (District Strategic plan) तयार करण्यात येणार आहे. आहे. जिल्हा विकास आराखडा तयार करणे व त्याला गुणात्मक सहाय्य देणे यासाठी जिल्हा व राज्यस्तरावर विविध समित्या स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

जिल्हा विकास आराखडा तयार करणे व त्याला गुणात्मक सहाय्य देणे यासाठी जिल्हा व राज्यस्तरावर खालीलप्रमाणे विविध समित्या स्थापन करण्यात येत आहेत.

**अ) जिल्हास्तरीय कार्यकारी समिती** (District Level Executive Committee):

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी (जि.प.) | - सदस्य |
| मनपा आयुक्त | - सदस्य |
| जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | - सदस्य |
| जिल्हा उद्योग अधिकारी | - सदस्य |
| जिल्हा नियोजन अधिकारी | - सदस्य |
| जिल्हा सांख्यिकी अधिकारी | - सदस्य |
| विविध विभागांचे जिल्हा प्रमुख/वरीष्ठ अधिकारी | - सदस्य |
| प्रमुख भागधारकांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| निवासी उपजिल्हाधिकारी | - सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-** जिल्हास्तरीय कार्यकारी समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल.

१. जिल्हा विकास आराखडा तयार करणे. यासाठी विविध क्षेत्र व उपक्षेत्रांची निवड करणे.

२. जिल्हा विकास आराखडा तयार करतांना विविध क्षेत्रातील Experts यांचा सहभाग प्राप्त करुन घेण्यासाठी तसेच त्यांचे मार्गदर्शन घेण्यासाठी जिल्हास्तरावर विविध कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

३. जिल्हा विकास आराखडा तयार करताना आजचे सकल जिल्हा उत्पन्न व त्यामध्ये पुढील पाच, दहा, पंधरा वर्षांच्या कालावधीत अपेक्षित असलेली वाढ यावरही लक्ष्य केंद्रीत करण्यात यावे.

४. कृती कार्यक्रमाचे वर्गीकरण कमी/मध्यम/दिर्घ मुदतीच्या बाबी याप्रमाणे करण्यात यावे.

५. जिल्हा विकास आराखडा तयार करण्याचे काम एप्रिल ते जून, २०२३ या तीन महिन्यांच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावे. जिल्हा विकास आराखडा तयार करण्यासाठीच्या मार्गदर्शक सूचना “परिशिष्ट अ” मध्ये देण्यात आल्या आहेत.

६. जिल्हा विकास आराखडा तयार करणे व तो भविष्यात राबविणे यासाठी राज्य शासनाकडून गुणात्मक सहाय्य प्राप्त करुन घेण्यात यावे.

७. जिल्हा विकास आराखडा तयार करण्यासाठी आवश्यकतेप्रमाणे दर आठवड्याला जिल्हास्तरीय कार्यकारी समितीची बैठक घेण्यात यावी. त्याचप्रमाणे आराखड्याची अंमलबजावणी करणे कामी दरमहा बैठक आयोजित करण्यात यावी.

कार्यकारी समितीने तयार केलेल्या आराखड्यास **जिल्हा नियोजन समितीच्या** बैठकीत मान्यता घेण्यात यावी व तो तद्नंतर शासनास अंतिम मान्यतेस्तव सादर करण्यात यावा.
जिल्हास्तरावर तयार करण्यात आलेल्या जिल्हा विकास आराखड्यांना (District Strategic Plan) मान्यता देण्यासाठी पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय कार्यकारी समिती गठित करण्यात येत आहे.

**ब) राज्यस्तरीय कार्यकारी समिती (State Level Executive Committee):**
राज्यस्तरीय कार्यकारी समितीची संरचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| मुख्य सचिव | - अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव, वित्त | - सदस्य |
| अपर मुख्य सचिव, ग्रामविकास | - सदस्य |
| अपर मुख्य सचिव, नियोजन | - सदस्य सचिव |
| प्रधान सचिव, कृषि | - सदस्य |
| प्रधान सचिव (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय) | - सदस्य |
| प्रधान सचिव, उद्योग | - सदस्य |
| प्रधान सचिव, नगर विकास-२ | - सदस्य |
| प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य | - सदस्य |
| प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता | - सदस्य |
| प्रधान सचिव, कौशल्य विकास | - सदस्य |
| प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण | - सदस्य |
| सचिव, शालेय शिक्षण | - सदस्य |
| सचिव, वैद्यकीय शिक्षण | - सदस्य |

**समितीची कार्यकक्षा :- राज्यस्त**रीय कार्यकारी समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल.

१. जिल्हा विकास आराखड्यांची छाननी करुन उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेस्तव सादर करणे.

२. जिल्हास्तरावर अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या जिल्हा विकास आराखड्याचा मासिक/ त्रैमासिक आढावा घेणे, तसेच त्याचे संनियंत्रण (monitoring) करणे.

३. जिल्हा विकास आराखड्याची अंमलबजावणी करण्यासाठी संबंधित यंत्रणांची क्षमतावृद्धी करणे.

राज्यस्तरीय कार्यकारी समितीने छाननी केलेल्या जिल्हा विकास आराखड्यांना अंतिम मान्यता देण्यासाठी पुढीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठित करण्यात येत आहे.

**क) उच्चस्तरीय समिती (Apex Committee):**

| | |
|---|---|
| मा. मुख्यमंत्री | - अध्यक्ष |
| मा. उप मुख्यमंत्री | - उपाध्यक्ष |
| मुख्य सचिव | - सदस्य |
| अपर मुख्य सचिव, वित्त | - सदस्य |
| अपर मुख्य सचिव, ग्रामविकास | - सदस्य |
| अपर मुख्य सचिव, नियोजन | - सदस्य सचिव |
| प्रधान सचिव, कृषि | - सदस्य |
| प्रधान सचिव (पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय) | - सदस्य |
| प्रधान सचिव, उद्योग | - सदस्य |
| प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण | - सदस्य |
| प्रधान सचिव, नगरविकास-२ | - सदस्य |
| प्रधान सचिव, आरोग्य विभाग | - सदस्य |
| प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता | - सदस्य |
| प्रधान सचिव, कौशल्य विकास | - सदस्य |
| सचिव, शालेय शिक्षण | - सदस्य |
| सचिव, वैद्यकीय शिक्षण | - सदस्य |

२. राज्यस्तरीय कार्यकारी समितीने सादर केलेल्या जिल्हा विकास आराखड्यांना उच्चस्तरीय समिती मान्यता देईल. राज्यस्तरीय कार्यकारी समिती व उच्चस्तरीय समितीच्या आवश्यकतेनुसार बैठका आयोजित करण्यात येतील. मात्र प्रत्येक तिमाहीतून एक वेळा राज्यस्तरीय कार्यकारी समितीची तर वर्षातून किमान दोन वेळा उच्चस्तरीय समितीच्या बैठका आयोजित करण्यात येतील. वरील सर्व समित्यांमध्ये अध्यक्ष्यांच्या परवानगीने आवश्यकतेनुसार अन्य सदस्यांचा समावेश “विशेष निमंत्रित” म्हणून करता येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२०१६१०२०६७१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AMOL ASHOK KHANDARE

Digitally signed by AMOL ASHOK KHANDARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=e7909ccae271ea0b779031a4180c74c487cb039b6c6d13626b1f6f4631078636, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=074A5DC84D2927F6D5AF70C017CCDF4EE143F3504EBF3DEC91F08EA109A7C34B, cn=AMOL ASHOK KHANDARE
Date: 2023.04.20 16:15:39 +05'30'

**( अमोल खंडारे )**

विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. विभागीय आयुक्त (सर्व)
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. आयुक्त, महानगर पालिका (सर्व)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०. नियोजन विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव
११. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१२. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
१३. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१४. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व)
१५. निवासी उपजिल्हाधिकारी (सर्व)
१६. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
१७. उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय (सर्व)
१८. निवड नस्ती, का-१४८१, नियोजन विभाग.

**नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. : डिएपी - १०२३/प्र.क्र.९८/का.१४८१,**

**दि. २० एप्रिल, २०२३ चे सहपत्र**

# परिशिष्ट - अ

## जिल्हा विकास आराखडा (District Strategic Plan) तयार करण्याच्या मार्गदर्शक सूचना

### पार्श्वभूमी :

भारत सरकारकडून स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त भारताला सन २०४७ पर्यंत "**विकसित भारत-भारत@२०४७ (India@२०४७)**"करण्याचा संकल्प करण्यात आलेला आहे. यामध्ये सन २०२५-२६ पर्यंत भारताची अर्थव्यवस्था ५ ट्रिलियन डॉलरपर्यंत नेण्याचे उद्दिष्ट जाहीर केले आहे. तसेच, सन २०३० पर्यंत शाश्वत विकास उद्दिष्टे सुध्दा साध्य करण्याचा भारत सरकारचा मानस आहे. विकसित भारताची ही उद्दिष्टे साध्य करीत असताना भारतातील राज्यांना सुध्दा सन २०४७ पर्यंत संपूर्णपणे विकसित होणे गरजेचे आहे. यादृष्टीने महाराष्ट्र राज्याची अर्थव्यवस्था सन २०२७ पर्यंत १ ट्रिलियन डॉलर, सन २०३७ पर्यंत २.५ ट्रिलियन डॉलर व सन २०४७ पर्यंत ३.५ ट्रिलियन डॉलर इतकी पोहोचविणे हे राज्याचे मुख्य ध्येय आहे.

याकरीता तीन टप्पे ठरविण्यात आले असून, पाहिला टप्पा सन सन २०२७ पर्यंत १ ट्रिलियन डॉलर व मधला टप्पा सन २०३७ पर्यंत २.५ ट्रिलियन डॉलर पर्यंत अर्थव्यवस्था पोहोचविणे हा असणार आहे. भारताच्या अर्थव्यवस्थेमध्ये राज्याची अर्थव्यवस्था ही सर्वात मोठी आहे. देशासाठी महाराष्ट्र राज्य नेहमीच विकास आणि प्रगतीचे केंद्र राहिले आहे. भारताच्या सकल उत्पन्नामध्ये (GDP) राज्याचा वाटा १५% आहे. राज्याच्या सकल उत्पन्नामध्ये सन २०२०-२१ करिता कृषी, सेवा क्षेत्र, व उद्योग क्षेत्राचा वाटा अनुक्रमे १३.२%, ६०% व २६.८% आहे. राज्याच्या अर्थव्यवस्थेस चालना देण्यासाठी व पर्यायाने विकसित भारतामध्ये राज्याचा मोठा वाटा असावा या दृष्टीने जिल्ह्यास केंद्रस्थानी ठेवून विशिष्ट नियोजन करण्याची आवश्यकता आहे. विकसित भारताचे ध्येय साध्य करण्यासाठी भारत सरकारमार्फत नीति आयोग (National Institution for Transforming India) कार्यरत आहे.

### विकासात जिल्ह्याचे स्थान :

सामूहिक, संस्थात्मक आणि सामाजिक-आर्थिक परिवर्तनाचे प्रयत्न म्हणून स्थानिक प्रशासन हा महत्वाचा टप्पा असून जिल्हा प्रशासनावर लक्ष केंद्रित करुन जागतिक मानके साध्य करण्याची आकांक्षा असलेले जिल्हे अन्य जिल्ह्यांसाठी प्रेरणादायी ठरले पाहिजेत. विकासाचे केंद्र म्हणून जिल्ह्यावर लक्ष केंद्रित केल्याने आर्थिक विकासासाठी विचारपूर्वक आणि विशिष्ट दृष्टीकोन विकसित करणे शक्य होईल

व असा विकास सर्वसमावेशक असेल आणि शाश्वत विकास उद्दिष्टे साध्य करण्यात मदतही करेल. विविध जिल्ह्यातील सामाजिक-आर्थिक परिस्थिती आणि नैसर्गिक संसाधनांमधील असमानता आणि जलद शहरीकरणाच्या आव्हानांना सामोरे जाण्याची गरज या सर्व बाबी विचारात घेऊन प्रत्येक जिल्ह्यासाठी "जिल्हा विकास आराखडा" (District Strategic plan) तयार करावयाचा आहे.

**जिल्हा विकास आराखडयाची ठळक वैशिष्ट्ये खालील प्रमाणे असतील:-**

**उद्दिष्टे:** विकसित भारतासाठी सन २०२७ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था १ ट्रिलियन डॉलर पर्यंत पोहचविण्याचे राज्याचे पहिल्या टप्यातील उद्दिष्ट आहे. या करीता

(१) थेट परकीय गुंतवणूकीमध्ये राज्याला दुसऱ्या क्रमांकावरून पहिल्या क्रमांकावर नेणे,

(२) भारताच्या सकल उत्पन्नामध्ये राज्याचे योगदान १५% वरुन २०% वर नेणे,

(३) शाश्वत विकास ध्येयामध्ये राज्याला ९ व्या क्रमांकावरुन ५ व्या क्रमांकावर नेणे,

(४) सर्व १६ शाश्वत विकास ध्येयांमध्ये राज्य फ्रन्टरनर किंवा त्यापेक्षा वरच्या श्रेणीत नेणे,

ही चार प्रमूख उद्दिष्ट्ये निश्चित करण्यात आली असून राज्याच्या उद्दिष्टपुर्तीसाठी "**बॉटमअप**" दृष्टीकोन वापरुन आर्थिकवाढ व राज्याच्या सकल उत्पन्नासाठी उत्प्रेरक म्हणून जिल्ह्यावर लक्ष केंद्रीत करणे आवश्यक आहे. केवळ अर्थसंकल्प कार्यक्रम आणि खर्चाच्या पारंपारीक संकल्पनेच्या पलीकडे जाऊन जिल्ह्याला गुंतवणूकीचे केंद्र अशी ओळख देणे जिल्हा विकास आराखड्यामध्ये अपेक्षित आहे.

**जिल्हा विकास आराखड्याचे नियोजन:**

जिल्ह्याच्या विकासासाठी धोरणात्मक नियोजन व अंमलबजावणी आराखडा तयार करावयाचा असून त्यामध्ये कृषि व संलग्न सेवा, उद्योग (वस्तुनिर्माण सह), जलसंधारण, पायाभूत सुविधा, शिक्षण, आरोग्य, कौशल्य विकास, पर्यटन व इतर विविध क्षेत्रांचा प्रामुख्याने समावेश असणार आहे. त्याचप्रमाणे, सदर विकास आराखडा तयार करताना विविध शाश्वत विकास ध्येये गाठण्यासाठी आवश्यक ती कार्यप्रणालीचा या आराखड्यात समावेश अंतर्भूत असणे आवश्यक आहे. याशिवाय जिल्ह्याचा मानव विकास निर्देशांक उंचाविण्यासाठी आवश्यक त्या शिक्षण, आरोग्य व उत्पन्नवाढ या क्षेत्रांवरही लक्ष केंद्रित करण्यात येईल.

**जिल्हा आराखड्यामध्ये समाविष्ट करावयाच्या बाबी**

**प्रकरण १ : जिल्ह्याची सद्य:स्थिती (District Factsheet)**

जिल्हा विकास आराखडा तयार करताना सर्वसाधारणपणे जिल्ह्याचे क्षेत्रफळ, भौगोलिक स्थान, लोकसंख्या, जिल्ह्याचे देशांतर्गत उत्पादन, साक्षरता, दरडोई उत्पन्न, वित्तीयसंस्था, जिल्ह्याचे देशांतर्गत उत्पादनातील प्रमुखक्षेत्रांचा वाटा, आर्थिकवाढीचा दर, सुक्ष्म, लघु, मध्यम उद्योगांची संख्या, क्लस्टर/पार्क/हब/ शिक्षणसंस्था/आयटीआय/महाविद्यालय/कारखाने/विशेष आर्थिकक्षेत्र (SEZ) / (PPP) प्रकल्पांची संख्या, निर्यातीचे प्रमाण इ. बाबी विचारात घेण्यात येतील.

**प्रकरण २ : Strengths, Weaknesses, Opportunities, Threats ओळखून SWOT Analysis**

जिल्हाधिकाऱ्यांनी आपल्या जिल्ह्याचे विश्लेषण करुन आपले Strengths, Weaknesses, Opportunities, Threats ओळखणे आवश्यक असून SWOT Analysis करावे. सदर SWOT करण्याकरीता संबंधित भागधारकांच्या (Stakeholders ) च्या कार्यशाळा आयोजित करण्यात याव्यात. त्याचप्रमाणे, तज्ञांची मते, विभागांच्या सूचना व नागरिकांचे अभिप्राय देखील घेण्यात यावेत. जिल्ह्याचे SWOT विश्लेषण केल्यानंतर जिल्ह्यामध्ये संभाव्य गुंतवणूकीला व विकासाला चालना देऊ शकणाऱ्या संधींचा अंदाज मिळू शकेल. याप्रमाणे तीन ते चार प्रमुख क्षेत्र निश्चित करुन त्यावर लक्ष केंद्रित करण्यात यावे. जिल्ह्यातील विविध क्षेत्रामधील गॅप्सचा अभ्याय करुन जिल्हा विकास आराखड्यामध्ये त्यासाठी आवश्यक त्या उपाययोजनांचा समावेश करण्यात यावा.

**प्रकरण ३ : जिल्ह्याचे व्हिजन (District Vision & Mission)**

जिल्हाधिकाऱ्यांनी आपल्या जिल्ह्यातील संभाव्य संधी ओळखल्यानंतर या संधीचा वापर करुन गुंतवणूकीच्या दृष्टीने जिल्ह्याचे व्हिजन तयार करावे. जिल्ह्याच्या विकासासाठी धोरणात्मक नियोजन व अंमलबजावणी आराखडा तयार करावयाचा असून त्याकरिता आर्थिक विकासाच्या दृष्टीकोनातून जिल्ह्याच्या विकासाचे व्हिजन सर्वसमावेशक व शाश्वत असावे. जिल्हाधिकाऱ्यांनी आपल्या जिल्ह्यातील विकासाच्या संभाव्य संधी ओळखून त्या संधीचा वापर करुन गुंतवणूकीच्या संबंधित क्षेत्रातील संकल्पनांचे स्पष्टीकरण करुन लक्ष्य गाठण्यासाठी अल्प/मध्यम/दीर्घ मुदतीचे साध्य ठरवावयाचे आहे. जिल्ह्याने ठरविलेले लक्ष्य हे सुस्पष्ट, सकारात्मक तसेच सर्व प्रमुख भागधारकांना प्रेरित करणारे असावे.

**प्रकरण ४ : प्रमुख भागधारकांसोबत सल्लामसलत (Identification & Participation of Major Stakeholders)**

जिल्ह्याच्या विकासामध्ये सहाय्यभूत ठरणाऱ्या विविध क्षेत्रांतील प्रमुख भागधारक (Major Stakeholders) सुरुवातीला ठरविण्यात यावेत. तद्नंतर, जिल्हा विकास आराखडा तयार करताना प्रमुख भागधारकांसोबत व जिल्ह्यात असलेल्या विविध शैक्षणिक संस्था, संशोधन संस्थांमधील प्राध्यापक, तज्ञ Experts तसेच विविध उद्योग, वित्तीय क्षेत्रातील संघटनांच्या प्रतिनिधींशी विचारविनिमय/ सल्लामसलत करुन आराखडा तयार करण्यात यावा. वरील भागधारकांपैकी काही प्रमुख भागधारकांना जिल्हास्तरीय कार्यकारी समिती मध्ये सहभागी करुन घेण्यात यावे.

**प्रकरण ५ : क्षेत्र व उपक्षेत्रांची निवड करणे (Identify Sectors & Sub Sectors)**

SWOT Analysis माध्यमातून निश्चित करण्यात आलेल्या तीन ते चार प्रमुख क्षेत्रांसाठी उपक्षेत्र निश्चित करुन त्यावर लक्ष केंद्रित करण्यात यावे. या विविध उपक्षेत्रांसाठी Key Performance Indicators चा वापर करुन त्याचे विश्लेषण करण्यात यावे व त्याआधारे स्वयंमूल्यांकन करण्यात यावे. स्वयंमुल्यांकनाबाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे देण्यात येतील.

## प्रकरण ६ : जिल्हा कृती आराखडा (Action Plan)

क्षेत्र व उपक्षेत्रांच्या स्वयंमुल्यांकनाच्या आधारे संबंधित उपक्षेत्र व त्यांना संलग्नित असलेल्या अन्य यंत्रणांचे बळकटीकरण करुन विकासाचे ध्येय साध्य करण्यासाठी कृती आराखडा तयार करण्यात यावा. कृति आराखड्यात अंतर्भूत असणाऱ्या बाबी सुस्पष्ट, साध्य करण्यायोग्य, सुसंगत व कालबद्ध असाव्यात. त्याआधारे, कृती कार्यक्रमाचे वर्गीकरण अल्प/मध्यम/दिर्घ मुदतीच्या बाबी याप्रमाणे करण्यात यावे.

## इतर सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना

१. जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत उपलब्ध असलेला विविध योजनांचा निधी व राज्य शासनाकडून प्राप्त होणारा राज्य योजनांचा निधी यांचे अभिसरण करुन जिल्हा विकास आराखड्याची अंमलबजावणी करण्यात येईल.

२. जिल्हा विकास आराखडा तयार करणे व त्याची अंमलबजावणी करणे ही बाब २०२३-२४ पासून जिल्हाधिकाऱ्यांच्या Key Result Areas (KRA) चा एक भाग असेल.

३. जिल्हा आराखड्यात भविष्यात काळानुरूप काही बदल करावयाचा झाल्यास वरील प्रक्रीया पुनश्च राबविण्यात येईल.

*****